उजनी प्रकल्पांतर्गत अहमदनगर जिल्हयातील कर्जत तालुक्यातील पुनर्वसित गावठाणांमधील नागरी सुविधा कामांना निधी उपलब्ध करुन देणेबाबत...

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

**शासन निर्णय क्रमांकः पुनर्व-२०१९/२८९/प्र.क्र.७६/र-८**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: ०४/११/२०१९

वाचा -

१) शासन परिपत्रक महसूल व वन विभाग क्र. आरपीए २००८/प्र.क्र.५५०/र-१, दि.१/८/२००९
२) शासन परिपत्रक महसूल व वन विभाग क्र. आरपीए ०१११/प्र.क्र.१८/र-१, दि.२८/३/२०११
३) शासन निर्णय वित्त विभाग क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७/४/२०१५
४) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि.०१/०४/२०१९
५) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र. पुनर्व-२०१७/५७७/प्र.क्र.०७/र-८, दि.१६/०१/२०१८
६) अधीक्षक अभियंता, भीमा कालवा मंडळ, सोलापूर यांचे पत्र क्र.भीकामं/लेखा/४२४२/ सन २०१९, दि.१०/०७/२०१९

प्रस्तावना -

उजनी प्रकल्पांतर्गत अहमदनगर जिल्हयातील कर्जत तालुक्यातील पुनर्वसित गावांमधील नागरी सुविधा कामांना संदर्भाधीन क्र. ५ येथील आदेशान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. सदर आदेशातील पूर्ण झालेल्या नागरी सुविधा कामांची देयके अदा करण्यासाठी रु.२६४.६० लक्ष रकमेचा निधी मागणी प्रस्ताव अधीक्षक अभियंता, भीमा कालवा मंडळ, सोलापूर यांनी सादर केला आहे.

२. त्यानुसार, प्रस्तावाधिन पूर्ण झालेल्या नागरी सुविधा कामांकरिता निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय-

त्यानुसार, उजनी प्रकल्पांतर्गत अहमदनगर जिल्हयातील कर्जत तालुक्यातील पुनर्वसित गावठाणांमधील पूर्ण झालेल्या नागरी सुविधा कामांसाठी प्रशासकीय मान्यता रकमेच्या मर्यादेत एकूण रु.२,५९,१२,५८०/- एवढा निधी सन २०१९-२० या चालू वित्तीय वर्षात खर्च करण्यास खालील अटीच्या अधीन राहून शासन मंजूरी देण्यात येत आहे.

**वित्त विभाग क्र. विअप्र.२०१३/ प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दि.१७ एप्रिल २०१५ अनुसार वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग तीन अनुक्रमांक ४ परिच्छेद क्र. २७ (२) (अ) अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारांनुसार, उजनी प्रकल्पांतर्गत अहमदनगर जिल्हयातील कर्जत तालुक्यातील पुनर्वसित गावांमधील पूर्ण झालेल्या नागरी सुविधा कामांची देयके अदा करण्यासाठी सन २०१९-२० या वित्तीय वर्षात BEAMS प्रणालीवर उपलब्ध**

**तरतूदीतून रु.२,५९,१२,५८०/- (अक्षरी रुपये दोन कोटी एकोणसाठ लक्ष बारा हजार पाचशे ऐंशी फक्त) एवढा निधी "मागणी क्रमांक सी-१०, लेखाशीर्ष ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च (००) (०३) इतर प्रकल्प, ५३ मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७) (दत्तमत)(कार्यक्रमावरील खर्च) " या लेखाशीर्षाखाली सन २०१९-२०२० या वित्तीय वर्षात उपलब्ध तरतूदीतून विभागीय आयुक्त, नाशिक यांना खालील अटींच्या अधिन राहून उपलब्ध करुन देण्यात येत आहे.**

**वित्तीय शिस्तीच्या अनुषंगाने सर्व संबंधितांनी खालील सूचनांची काटेकोरपणे अंमलबजावणी करावी.**

१) विभागीय आयुक्त, नाशिक यांनी त्यांना या आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित नियंत्रण अधिकारी म्हणून संबंधित अधीक्षक अभियंता, भीमा कालवा मंडळ, सोलापूर यांचेकडे अर्थसंकल्प वितरणप्रणाली BEAMS द्वारे तात्काळ वितरित करावा.

२) अधीक्षक अभियंता, भीमा कालवा मंडळ, सोलापूर यांनी नागरी सुविधा व तदनुषंगिक कामांसाठी वितरीत सदरचा निधी विभागीय आयुक्त, नाशिक यांचेकडून प्राप्त होताच संबंधित कार्यकारी अभियंता यांचेकडे विनाविलंब वितरित करावा.

३) नागरी सुविधा कामांसाठी शासनाच्या पुनर्वसन विभागाकडून निधी उपलब्ध करुन दिला जात असल्याने नागरी सुविधा कामांची देयके अदा करण्यासाठी संबंधित पाटबंधारे विकास महामंडळाकडून कोणतीही परवानगी/मंजुरी घेण्याची आवश्यकता नाही.

४) कार्यकारी अभियंता, उजनी कालवा विभाग क्र.८, सोलापूर यांनी या आदेशान्वये मंजूर केलेला निधी प्राप्त होताच नागरी सुविधा कामांची प्रलंबित देयके तात्काळ अदा करावीत, तदनुषंगाने कार्यपूर्ती अहवाल शासन, विभागीय आयुक्त, नाशिक तसेच संबंधित जिल्हाधिकारी यांना सत्वर सादर करावा.

५) या आदेशान्वये मंजूर करण्यात आलेला व प्राप्त झालेला निधी मंजूर नागरी सुविधा कामांवरच खर्च करण्यात यावा तसेच सदर निधी खर्च करताना मंजूर केलेल्या अनुदानापेक्षा कोणत्याही परिस्थितीत जास्त खर्च होणार नाही याची कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

६) मंजूर निधी शासनाच्या पूर्वमान्यतेशिवाय अन्य कामांवर खर्च होणार नाही याची संबंधित प्रकल्प अधिकारी यांनी दक्षता घ्यावी .

७) सदरच्या आदेशातील नमूद मुख्यलेखाशीर्ष मागणी क्र.सी-१०, ४७०१, मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च (००) (०३) इतर प्रकल्प, ५३ मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७) (दत्तमत) या लेखाशीर्षांतर्गत कोणताही निधी शिल्लक रहाणार नाही अथवा सदर आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित यंत्रणेच्या कोणत्याही Operational Bank Account /PLA (स्वीय प्रपंची खाते) मध्ये जमा करून ठेवण्यात येणार नाही, याची संबंधित यंत्रणेचे अधीक्षक अभियंता व कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

८) सदरच्या आदेशातील नमूद मुख्यलेखाशीर्ष मागणी क्र.सी-१०, ४७०१, मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च (००) (०३) इतर प्रकल्प, ५३ मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७) (दत्तमत) या लेखाशीर्षांतर्गत एक वर्षापूर्वीचे कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही, याची संबंधित यंत्रणेचे अधीक्षक अभियंता व कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

९) मुख्यलेखाशीर्ष मागणी क्र. सी-१०, ४७०१, मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च (००) (०३) इतर प्रकल्प, ५३ मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७) (दत्तमत) या लेखाशीर्षांतर्गत संबंधित संनियत्रण अधिकारी यांनी होणाऱ्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवून शासनाच्या प्रचलित लेखा पध्दतीनुसार ते महालेखापाल यांना सादर करावेत. तद्नुषंगाने या लेखाशीर्षाखाली होणाऱ्या खर्चाचा ताळमेळ, विनियोजन लेखे इत्यादि कामे संबंधितांनी प्रचलित पध्दतीप्रमाणे करावीत.

१०) यासंदर्भातील खर्च विवरणपत्रे/ अहवाल शासनास न चुकता सादर करण्यात यावीत. वरील निधीसंबंधित खर्च ताळमेळाची विवरणपत्रे महालेखापाल कार्यालयाच्या Reconcillation Slip सह शासनास न चुकता सादर करावीत.

११) संबंधित अधीक्षक अभियंता व संबंधित कार्यकारी अभियंता यांनी या आदेशान्वये वितरीत निधीचे उपयोजन प्रमाणपत्र Utilisation Certificate महालेखापाल कार्यालय,संबंधित जिल्हाधिकारी/ विभागीय आयुक्त/शासनास तातडीने सादर करावे.

१२) यासंदर्भातील लेखाशीर्षाखाली चालू वित्तीय वर्ष सन २०१९-२०२० मध्ये मंजूर करण्यात आलेल्या निधीच्या अनुषंगाने खर्चाचा विनियोजन लेखा संबधितांनी विहित कालावधीत शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९११०४१७२९०९०११९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dayanand S Munjale

Digitally signed by Dayanand S Munjale
DN: CN = Dayanand S Munjale, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Revenue And Forest Department
Date: 2019.11.04 17:31:14 +05'30'

**(दयानंद शं. मुंजाळे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त तथा मुख्य नियंत्रण अधिकारी (पुनर्वसन), नाशिक विभाग, नाशिक
२. उप आयुक्त (पुनर्वसन), नाशिक
३. जिल्हाधिकारी तथा पुनर्वसन उपसंचालक, अहमदनगर
४. अधीक्षक अभियंता, भीमा कालवा मंडळ, सोलापूर.
५. कार्यकारी अभियंता, उजनी कालवा विभाग क्र.८, सोलापूर.
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१,नागपूर-२ (२ प्रतीत)
७. महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१, नागपूर-२ (२ प्रतीत)
८. जिल्हा कोषागार अधिकारी, सोलापूर
९. जलसंपदा विभाग, कार्यासन मोप्र-२, मंत्रालय, मुंबई ३२
१०.वित्त विभाग, कार्यासन व्यय-१०, अर्थसंकल्प-३, मंत्रालय, मुंबई-३२.

११.नियोजन विभाग,कार्यासन १४७५, मंत्रालय, मुंबई ३२.
१२.महसूल व वन विभाग, कक्ष अधिकारी ब-१, मंत्रालय, मुंबई - ३२
१३.महसूल व वन विभाग , पी.ए.सी.कार्यासन ,मंत्रालय, मुंबई ३२.
१४.निवडनस्ती कार्यासन र-८, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

*****

**शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र: पुनर्व-२०१९/२८९/प्र.क्र.७६/र-८, दि.०४/११/२०१९ सोबतचे विवरणपत्र**

**उजनी प्रकल्पांतर्गत अहमदनगर जिल्हयातील कर्जत तालुक्यातील पुनर्वसित गावठाणांमधील पूर्ण झालेल्या नागरी सुविधा कामांकरिता वितरीत निधीचा तपशील**

| अ.क्र. | पुनर्वसित गाव | नागरी सुविधा कामाचे नाव | वितरीत निधी (रुपये) |
|---|---|---|---|
| १ | गणेशवाडी | दातेरवस्ती ते अंबेराय वस्ती पोहोचरस्ता कि.मी १ | ४६,१९,८९०/- |
| २ | गणेशवाडी | दातेरवस्ती ते अंबेराय वस्ती पोहोचरस्ता कि.मी. २ | ४६,१९,८९०/- |
| ३ | गणेशवाडी | गणेशवाडी ते दातेरवस्ती पोहोचरस्ता | ४६,१९,९००/- |
| ४ | गणेशवाडी | गणेशवाडी पाणी उपसा योजना पोहोचरस्ता कि.मी.१ | ४६,१९,९००/- |
| ५ | गणेशवाडी | स्मशानशेड साठी कट्टा व पोहोचरस्ता | २८,२०,०००/- |
| ६ | आवटेवाडी | स्मशानशेड साठी कट्टा व पोहोचरस्ता | २८,२०,०००/- |
| ७ | शिंपोरा | स्मशानशेड साठी कट्टा व पोहोचरस्ता | १७,९३,०००/- |
| | | **एकूण** | **२,५९,१२,५८०/-** |

Dayanand S Munjale

Digitally signed by Dayanand S Munjale
DN: CN = Dayanand S Munjale, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Revenue And Forest Department
Date: 2019.11.04 17:31:31 +05'30'

(दयानंद शं. मुंजाळे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन